सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधी वितरीत करण्याबाबत. महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- पुरक २०२१/प्र.क्र.७३/महामंडळे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २३ फेब्रुवारी, २०२२

**संदर्भ :-** सन २०२१ चे हिवाळी अधिवेशनामधील बाब क्र. २४९

**प्रस्तावना:-**

मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांनी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता रु. १००.०० कोटी निधी उपलब्ध करून देण्याबाबत घोषणा केली होती. त्यानुसार महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाकरिता मागणी क्र. झेडजी-३, ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) (२२२५एफ२५४) अंतर्गत प्रस्तावित करण्यात आली होती. सन २०२१ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये बाब क्र. २४९ अन्वये रु. १००.०० कोटींची पुरवणी मागणी मान्य झाली आहे. सदर मागणीपैकी ५०% निधी वितरण करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता रु. १०००.०० ची मुळ तरतुद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. सदर महामंडळास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता रु. ५०.०० कोटी ( रुपये पन्नास कोटी फक्त) एवढे वेतनेतर अनुदान खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. योजनांतर्गत निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत. तसेच ज्या योजनेसाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच योजनेसाठी निधी खर्च करण्यात यावा.
२. व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
३. विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.
४. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.
५. महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी ठोस प्रयत्न करावेत.
६. सदर योजनेचा निधी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.
७. उपरोक्त निधीचा खर्च करतांना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करून निधीचा विनियोग करावा.

**०२.** वरील अनुदानाबाबत सह सचिव/ उप सचिव (रोखशाखा), इतर मागास बहूजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी, कक्ष अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहूजन कल्याण विभाग यांनाआहरण व संवितरण अधिकारी, म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ (मर्यादित), मुंबई यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

**०३.** याबाबीवर खर्च मागणी क्र. झेडजी-३, २२२५ (०१) (०५), महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाला सहायक अनुदान (कार्यक्रम), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२२५एफ२५४) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०४.** हा शासन निर्णय वित्त विभागाच्याअनौपचारिक संदर्भ क्र. ६७८ / दि.०८.०२.२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२३११३८२३०२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARSHA SUNIL SAMANT

Digitally signed by VARSHA SUNIL SAMANT
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=OTHER BACKWARD BAHUJAN KALYAN DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=765dae4fef3315c4544a15270edc443fbacf630172f5e6b732d16b64198d81ba,
serialNumber=af4e3a3aadaca1026547ef614df4de89d66994806d3760116b32bb3aadeaf9fb, cn=VARSHA SUNIL SAMANT
Date: 2022.02.23 11:44:48 +05'30'

**( व. सु. सामंत )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहूजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळा, मुंबई
३. महालेखापाल (ले व अ) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
४. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई /ठाणे
६. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
७. वित्त विभाग (का- व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई
८. नियोजन विभाग (का. १४१३), मंत्रालय, मुंबई.
९ . सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई
१०. उप सचिव/ कक्ष अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहूजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (महामंडळे).